होमगार्डना १० तासांपेक्षा जास्त काम
कर्तव्य केल्यास उपहारभत्ता मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग [विशेष]
शासन निर्णय क्रमांक : एचजीएस ३६८७/१०९२/विशेष-८,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २१ जुलै १९९३.

वाचा :- महासमादेशक, होमगार्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे दिनांक २९.१०.९० चे पत्र क्रमांक ८९००/प्रशासन.

शासन निर्णय :- पोलीस शिपाई यांना २४ तासाच्या कालावधीत सतत १० तासापेक्षा जास्त कालावधीसाठी बंदोबस्त ड्यूटी किंवा इतर कामासाठी कर्तव्यार्थ राहिल्यास १० रु. उपहार भत्ता मंजूर करण्यात आला आहे. त्याच धर्तीवर आता होमगार्डनो २४ तासांच्या कालावधीत सतत १० तासापेक्षा जास्त काम कर्तव्य केल्यास त्यांना रु. १०/- [रुपये दहा फक्त ] उपहार भत्ता देण्यास शासन हा आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून मंजुरी देत आहे.

२. यासाठी होणारा खर्च "२०७०- इतर प्रशासनिक सेवा -१०७ होमगार्ड" या लेखा शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो यासोबत १९९३-९४ या आर्थिक वर्षासाठी नवीन बाब भाग-१ द्वारे आवर्ती खर्च रु. ५६,००,०००/- [रुपये छप्पन्न लाख फक्त ] म्हणून मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक साजार ५५७/९२/व्यय-८, दिनांक १०.१२.९२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही /-

[ मा. क. राठोड ]
उप सचिव, गृह विभाग [विशेष] महाराष्ट्र शासन,